मत्स्यव्यवसाय विभागामधील गट-अ व गट-ब अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.मत्स्यआ-२०१५/प्र.क्र.११/पदुम-१२,**
**मंत्रालय,मुंबई-३२.**
**दिनांकः- १४ मे,२०१५.**

वाचा:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५.
२) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी/ २८४/ प्र.क्र.३६२/१२,दि.२६.११.२०१४.

प्रस्तावना:-

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियम करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम २००५,अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम-६ मध्ये गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी निश्चित करण्यात आलेले आहेत. सदर अधिनियमातील कलम -६ मधील परंतुक २ व कलम ७ मधील तरतुदीनुसार मत्स्यव्यवसाय विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:-

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५, च्या कलम ६ मधील परंतुक २ व कलम ७ नुसार मत्स्यव्यवसाय विभागातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली करण्याचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांच्या पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार गट | महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकारी | बदली करण्याचा अधिकार प्रत्यार्पित करावयाचा अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | रु.१०,६५०-१५,८५० व त्यापेक्षा अधिक वेतनश्रेणी असलेले गट-अ मधील सर्व अधिकारी | मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री |

| | | | |
|---|---|---|---|
| २. | रु.१०,६५०-१५,८५० पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-अ मधील सर्व अधिकारी | मा.मंत्री (पदुम) | सचिव (पदुम) |
| ३. | रु.७४५०-११,५०० व त्यापेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट-ब मधील सर्व अधिकारी | मा.मंत्री (पदुम) | आयुक्त मत्स्यव्यवसाय |

अनियतकालिक बदल्या करताना एक टप्पा वरिष्ठ सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५१४१७४९१०३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: CN = Shashank Madhav Sathe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.14 17:51:37 +05'30'

**(श.मा.साठे)**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
२. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
३. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
४. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई-३२.
५. आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,मुंबई
६. सर्व प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपायुक्त
७. सर्व सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय
८. निवडनस्ती.